प्रधानमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-१३ मधील पॅकेज क्र. एमएच-१९८७ (L-०८४) मधील जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/००० ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार या रस्त्याच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो-२०२०/प्र.क्र.१८२/बांधकाम-२**
**मंत्रालय, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई - ४०० ००१**
**तारीख: १४ मार्च, २०२४**

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो-२०१४/प्र.क्र.१६७/योजना-९, दिनांक २७.०७.२०१७

२) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः C.E/PMGSY/८६०/२०२०, दिनांक २०.१०.२०२०.

3) NRIDA, नवी दिल्ली यांचे पत्र NRIDA-PO17(24)/9/2017-JD (Tech)(E:356490), Dated 19.01.2022

४) व्यय अग्रक्रम समितीचे दिनांक ०५ ऑक्टोबर,२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-१३ पॅकेज क्र. एमएच-१९८७ मधील (L-०८४) जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/००० ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार या रस्त्याच्या कामास संदर्भ क्र.१ येथील दिनांक २७ जुलै, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.५९३.१९ लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक १० मे, २०१८ रोजी देण्यात आला आहे.

०२. सदर मंजूर रस्त्यांची संपूर्ण लांबी ही सातपुडा पर्वतरांगेमधून जात असून, सदर भूभाग हा आदिवासी बहुल व वन विभागाच्या अखत्यारीत जमिनीचा आहे. तसेच सदर पर्वतरांगांमधील काही भाग ठिसूळ असून मोठ्या पावसादरम्यान दरडी कोसळण्याचे प्रमाणदेखील अधिक आहे. सदर रस्त्याचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) हा उपलब्ध वन विभागाच्या नकाशांवरून, स्थलाकृती नकाशे, पायवाटा इत्यादीच्या सहाय्याने तयार करण्यात आला होता. रस्तानिर्मितीच्या प्रत्यक्ष कार्यवहनाच्या वेळी वनविभाने सुचविलेल्या नविन अलाईनमेंट नुसार रस्त्याची लांबी ९.६५० कि.मी. इतकी झाली. या बदलामूळे पर्वतरांगांमधील दगडफोडीच्या प्रमाणात वाढ झाली. उपरोक्त कारणांमुळे तसेच रस्ता सुरक्षाविषयक उपाययोजनांत अधिकची वाढ करण्यात आल्यामुळे रस्तानिर्मितीच्या खर्चात वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता.

सदर रस्त्याच्या बांधकामाच्या सुधारीत वाव व वाढीव खर्चास केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये मान्यता प्रदान केली आहे.

०३. प्रधानमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-१३ पॅकेज क्र. एमएच-१९८७ मधील (L-०८४) जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/००० ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार या रस्त्याचे सातपुडा पर्वताच्या भौगोलिक परिस्थितीमुळे आणि वनविभागाने सूचविल्यानुसार रस्त्याच्या अलाइनमेंट बदल झाल्यामुळे सदर कामाच्या मूळ किंमतीमध्ये वाढ झाल्याने सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-१३ पॅकेज क्र. एमएच-१९८७ मधील (L-०८४) जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/००० ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार या रस्त्याच्या कामात प्रस्तावनेत नमूद कारणांमुळे किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२.उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

**(रु. लक्ष मध्ये)**

| पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | स्वीकृत निविदा रक्कम | सुधारीत खर्च | प्रशासकीय मान्यता रक्कमेपेक्षा अधिकचा खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्तीच्या खर्चाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| पॅकेज क्र. एमएच - १९८७ | प्रधानमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-१३ पॅकेज क्र.एमएच-१९८७ मधील (L-०८४) जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/०००ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार | ५९३.१९ | ६४९.८६ | १०२८.६५ (केंद्र हिस्सा रु.३५५.९१ राज्य हिस्सा रु.६७२.७४ ) | ४३५.४६ | ७३.४१ |
| एकूण | | **५९३.१९** | **६४९.८६** | **१०२८.६५** | **४३५.४६** | **७३.४१** |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पूर्ण करावयाचे झाल्यास रू.१०२८.६५ लक्ष इतका अंतिम खर्च असून, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या ७३.४१ % जास्तीचा म्हणजेच रू.४३५.४६ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार सुधारित अंदाजपत्रकातील अधिक्य सुरूवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५% पेक्षा अधिक्याचा (७५.९६ %) असल्याने सदर प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार प्रधानमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-१३ पॅकेज क्र. एमएच-१९८७ मधील (L-०८४) जांगठी ते चिमलखेडी रस्ता सा.क्र.०/००० ते ८/२३०, ता.अक्कलकुवा, जि.नंदुरबार या रस्त्याच्या रू.१०२८.६५ लक्ष इतक्या रकमेस खालील नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४.१ सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार C-DAC पुणे यांच्या मदतीने OMMAS संगणक प्रणालीमध्ये योग्य ते बदल केले जातील याची दक्षता घेण्यात यावी.

४.२ सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

४.३ योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीचे प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे पालन करावे व त्रुटींची पूर्तता करावी.

४.४ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्यात यावी.

०५. सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत नवीन रस्ते व पूल बांधणी व अस्तित्वातील रस्त्याचे दर्जोन्नतीकरण (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे-५०५४ ५२३३ व (केंद्र हिस्सा ६० टक्के) ५०५४ ५२२४ या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

०६. प्रस्तुतचा शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ९१/१४४४, दिनांक ११.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक ०५ सप्टेंबर, २०२३ रोजी पार पडलेल्या बैठकीबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०५ ऑक्टोबर, २०२३ अन्वये निर्गमित केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१७५६०१६९२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.14 20:42:29 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र राज्य.

२. मा.मंत्री, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
३. सहसचिव (आरसी) व संचालक National Rural Infrastructure Development Agency (NRIDA),नवी दिल्ली.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.), ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. संचालक (Technical), National Rural Infrastructure Development Agency (NRIDA),नवी दिल्ली.
८. संचालक (Project-I), National Rural Infrastructure Development Agency (NRIDA),नवी दिल्ली.
९. सचिव (मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
११.मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
१२.वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, मंत्रालय, मुंबई.
१३.अधीक्षक अभियंता, प्रमंग्रासयो, नाशिक विभाग, नाशिक.
१४.कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, नंदुरबार.
१५.जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
१६.आय.टी.नोडल अधिकारी, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे.
१७.कक्ष अधिकारी कार्यासन बांधकाम-१, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती-बांधकाम-२